वांगणा उपसा सिंचन योजना ता. कोरेगाव जि. सातारा द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१५/(प्र.क्र.१०५/१५)/मध्यम प्रकल्प**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- १९ मे, २०२२.**

**संदर्भ:-**

१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे महामंडळ निर्णय क्र. मप्र-३/२९९/(४०७/९९/१०६६८) दि. २२/१२/१९९९

२) शासन निर्णय क्र. कृप्र.मा ०३०१/ सा ७८२/(२२४)/२००१/मोप्र १ दिनांक ११/०७/२००१

३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र जा.क्र. मकृखोविम/ ०३१४/(४५०/२०१४)/प्रशा ५ दिनांक ३०/०१/२०१५

**प्रस्तावना:-**

कोरेगांव तालुक्याच्या उत्तर- पूर्व भागातील कायम दुष्काळी क्षेत्रास सिंचनाची सोय करण्यासाठी वांगणा उपसा सिंचन योजना राबविण्यात येत आहे. योजनेद्वारे धोम डावा कालवा कि.मी. ५३ येथून (सा.क्र. ५२/२०० कि.मी.) ही योजना तीन टप्प्यामध्ये असून पहिल्या टप्प्यामध्ये एकूण ८६.९६ मी.स्थिर उंचीपर्यंत, दुस-या टप्पयामध्ये १४.८४ मी.स्थिर उंची पर्यंत व तिस-या टप्प्यामध्ये २३.९७ मी. स्थिर उंचीपर्यंत पाणी उपसा पहील्या टप्प्यात ३३३७ हे व दुस-या टप्प्यात ७४९ हे. आणि तिस-या टप्प्यात ११४ हे.क्षेत्र असे एकूण ४२०० हे. क्षेत्र सिंचनाखाली आणण्यात आले आहे. या योजनेसाठी १.३४ अब्ज घ.फू. इतका पाणीवापर प्रस्तावित असून पाण्याचा पुरेपूर वापर होण्यासाठी प्रवाही कालव्याऐवजी, बंद नलिकेद्वारे वहन व वितरण सिंचन प्रणाली भाग § १ ची कामे वगळून कार्यान्वित आहे.

वांगणा उपसा सिंचन योजनेस संदर्भ क्र. ०१ अन्वये दरसूची सन १९९९-२००० नूसार रु. ४८.०५ कोटी इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. यानंतर संदर्भ क्र. ०२ अन्वये दरसूची सन १९९९-२००० नूसार रु. ७९.१८ कोटी किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता देण्यात आली.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ यांचे संदर्भ क्र. ०३ अन्वये सन २०१३-१४ दरसूची वर आधारित रु. १२५.०६ कोटी इतक्या किंमतीच द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

रु.७९.१९ कोटी च्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या तुलनेत व्दितीय सुधारीत प्रकल्प अहवालाची किंमत रु.४५.८८ कोटीने जास्त आहे. किंमत वाढीची कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अनुक्रमांक | बाब | वाढ (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १ | दरसूचीतील बदलामुळे झालेली वाढ | ५५.३४ |
| २ | विविध कारणामुळे बचत | -९.४७ |
| | **एकूण वाढ** | **४५.८७** |

या योजनेसाठी १.३४ अब्ज घ.फू. इतका पाणीवापर प्रस्तावित असून पाणी उपसा करून कोरेगांव तालुक्यातील वांगणा नदीच्या पूर्व व पश्चिम भगातील १७ गावातील एकूण ४२०० हे. इतके सिंचन क्षेत्र सिंचनाखाली आणण्याचे प्रस्तावित आहे.

त्यानुसार दिनांक २४/०२/२०२२ रोजीच्या व्यय अग्रक्रम समितिच्या बैठकीत सदर प्रस्ताव विचारार्थ सादर करण्यात आला. सदरील बैठकीमधे बांधकामाची सद्य:स्थिती, किंमतवाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन वांगणा उपसा सिंचन योजना सन २०१३-१४ दरसूची वर आधारित रुपये १२५.०६ कोटी किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या या निर्णयाव्दारे वांगणा उपसा सिंचन योजनेच्या सन २०१३-१४ दरसूची वर आधारित रुपये १२५.०६ कोटी (रुपये एकशे पंचवीस कोटी सहा लक्ष फक्त) किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ०१/२०२२ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे भाग भांडवली अंशदान (४७०१-एच ७२९) या लेखाशिर्षाखाली टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्त्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपद्धती अनुसरणे, राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जवाबदारी कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांची राहील.

ii) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालतील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जवाबदारी कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांची राहील.

iii) **आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येणार नाही.**

iv) **प्रकल्पाचे काम नियोजनानुसार पुर्ण करण्यात येईल.**

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक २३/२०२०/का. १४३४ दिनांक ६/११/२०२०, वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८२/२०२० /व्यय-१२ दिनांक १३/११/२०२०० तसेच व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक- २४/०२/२०२२ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०५१९११०४५६७०२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ATUL ASHOK KAPOLE

Digitally signed by ATUL ASHOK KAPOLE
DN: CN = ATUL ASHOK KAPOLE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.05.19 11:08:43 +05'30'

(अतुल कपोले)
**शासनाचे सहसचिव**

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१३. मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग, पुणे.
१६. उपसचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि/दक्षता),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. उपसचिव (आस्था-कार्यासन), (दक्षता-कार्यासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा.
१९. कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा.
२०. वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२१. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२२. मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

**उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा**
**वांगणा उपसा सिंचन योजना ता. कोरेगाव जि. सातारा**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१५/(प्र.क्र.१०५/१५)/ मध्यम प्रकल्प**
**दिनांक १९/०५/२०२२ चे सहपत्र.**

**(किंमत रुपये लक्ष)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर प्रथम सु.प्र.मा.नुसार | व्दितीय सु.प्र.मा.नुसार | वाढ/घट (+ / -) |
|---|---|---|---|---|
| | **(अ) शीर्ष कामे** | | | |
| १ | ए-प्राथमिक कामे. | ५.१८ | ५०.४५ | ४५.२७ |
| २ | बी-जमिन. | ८०.२६ | ५७.१ | -२३.१६ |
| ३ | सी-कामे. | १५६०.८५ | २७७२.८८ | १२१२.०३ |
| ४ | अ.यांत्रिकी कामे | ८६२.५ | १३६३.२ | ५००.७ |
| ५ | ब.विद्युत कामे | ४७०.४४ | ४७४.२५ | ३.८१ |
| ६ | क.मुख्य कालवा व शाखा कालवे / उर्ध्वगामी नलिका | ० | ० | ० |
| ७ | डी-विमोचक | ० | ० | ० |
| ८ | ई-धबधबे | ० | ० | ० |
| ९ | एफ-आर.एच.टी.कामे. | ३६४.३९ | ० | -३६४.३९ |
| १० | जी-पूल | ९.९७ | ० | -९.९७ |
| ११ | एच-वाट (Escape) | ० | ० | ० |
| १२ | के -इमारती. | ९ | १९.८२ | १०.८२ |
| १३ | एल-मातीकाम. | ३०७ | | -३०७ |
| १४ | एम-वनीकरण. | ० | ० | ० |
| १५ | ओ-संकिर्ण. | ० | ० | ० |
| १६ | पी-देखभाल. | ० | ० | ० |
| १७ | आर-दळणवळण. | ४५.८९ | १००.५४ | ५४.६५ |
| १८ | क्यू - स्पेशल हत्यारे व अवजारे | ० | ० | ० |
| १९ | यु' वितरीका | २४३५.३४ | ५३३५.७१ | २९००.३७ |
| २० | लाभक्षेत्र विकासाची कामे | ० | ० | ० |
| २१ | जलनिस्सारण | ० | ० | ० |
| २२ | एक्स - पर्यावरण | ० | ० | ० |
| २३ | माहिती संकलन व त्याचे विश्लेषण | ४४.३ | ३५३.४५ | ३०९.१५ |
| २४ | कंत्राटदाराकडून देखभाल व दुरुस्ती २ वर्षाकरिता | ० | २८१.६९ | २८१.६९ |

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर प्रथम सु.प्र.मा.नुसार | व्दितीय सु.प्र.मा.नुसार | वाढ/घट (+ / -) |
|---|---|---|---|---|
| २५ | तांत्रिक सल्लागारकरिता तरतूद | ४४.३ | ० | -४४.३ |
| २६ | आस्थापनाकरिता तरतूद | १२५८.९ | ११९४.६२ | -६४.२८ |
| २७ | ऑडीनरी टी ॲन्ड पी | २२०.३ | ३७६.४५ | १५६.१५ |
| २८ | कन्टीजन्सीज डब्लु सी- Estt | १३५.३३ | ० | -१३५.३३ |
| २९ | आर ॲन्ड आर | -१.३५ | ० | १.३५ |
| ३० | Indirect charge | ६६.१८ | १२६.०९ | ५९.९१ |
| | **एकूण** | **७९१८.७८** | १२५०६.२५ | ४५८७.४७ |
| **एकूण किंमत:** | | **७९१८.७८** | १२५०६.२५ | ४५८७.४७ |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) ४२०० हेक्टर आहे.

ब) लाभव्यय गुणोत्तर - १.५

ATUL ASHOK KAPOLE

Digitally signed by ATUL ASHOK KAPOLE
DN: CN = ATUL ASHOK KAPOLE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.05.19 11:09:08 +05'30'

(अतुल कपोले)
शासनाचे सहसचिव